महसूल विभागाच्या ताब्यात असलेल्या वनजमिनी वन विभागास परत करण्याबाबत तसेच वनजमिनीची नोंद अभिलेखात अद्यावत करण्याची कालमर्यादा ठरविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक :- एस-१०/२०१६/प्र.क्र.४१३/फ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०२ डिसेंबर, २०१६.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक क्र.एलएनडी-१०७६/२१८६-जी-१, दिनांक १४.०४.१९७६

२) शासन निर्णय क्र.एस-१०/२००७/प्र.क्र.१७२/फ-३, दिनांक ०९.१०.२००७.

३) शासन ज्ञापन क्र.एस-१०/२०१६/प्र.क्र.४१३/फ-३, दिनांक ०४.०८.२०१६.

**शासन परिपत्रक :**

राज्यातील वन विभागाच्या एकूण क्षेत्रापैकी काही क्षेत्र महसूल विभागाच्या ताब्यात आहे. महसूल विभागाच्या ताब्यात असलेल्या वनक्षेत्रात काही ठिकाणी अतिक्रमण झाल्याचे निर्देशनास आले आहे. महसूल विभागाच्या ताब्यातील वनक्षेत्रापैकी काही क्षेत्राचे विविध प्रयोजनासाठी वाटप ही करण्यात आलेले आहे. महसूल विभागाच्या ताब्यात असलेल्या वनक्षेत्रावर झालेले अतिक्रमण दूर करुन सदर वनक्षेत्र वन विभागाच्या ताब्यात देण्यासाठी याआधी शासनामार्फत वारंवार सूचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, अद्याप ही याबाबत अपेक्षित कार्यवाही पूर्ण झालेली नाही.

२. वनजमिनीचे संरक्षण तथा योग्य व्यवस्थापन करण्यासाठी महसूल विभागाच्या ताब्यात असलेली वन जमीन महसूल विभागाने तात्काळ वन विभागाकडे वर्ग करणे आवश्यक आहे. सबब, सर्व जिल्हाधिकारी यांनी वन विभागाशी समन्वय राखून त्यांच्या अधिनस्त असलेल्या वन जमिनीपैकी महसूल विभागामार्फत यापूर्वी वाटप करण्यात आलेले क्षेत्र वगळून उर्वरीत क्षेत्रापैकी अतिक्रमण विरहित क्षेत्र वन विभागाच्या ताब्यात देण्याची कार्यवाही विनाविलंब पूर्ण करावी.

३. महसूल विभागाच्या ताब्यातील जी वनजमीन वन विभागास वर्ग करणे काही कारणास्तव शक्य नसेल, अशा जमिनीची यादी तयार करुन कारणमिमांसेसह शासनास अहवाल सादर करण्यात यावा. तसेच महसूल विभागाने विविध प्रयोजनासाठी पूर्वी वाटप केलेले वनक्षेत्र व अतिक्रमीत वनक्षेत्र नियमीत करण्यासाठी त्याबाबतचा वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत प्रस्ताव शासनास तात्काळ सादर करण्यात यावा.

४. महसूल विभागाच्या ताब्यात असलेल्या वनक्षेत्रापैकी अतिक्रमण विरहित वनक्षेत्र वन विभागास परत करण्यासाठी खालीलप्रमाणे कालमर्यादा ठरवून देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | करावयाची कार्यवाही | संबंधित प्राधिकरण | कालमर्यादा |
|---|---|---|---|
| १ | महसूल विभागाच्या ताब्यात असलेली वन जमिनीची यादी तयार करणे. दोन्ही विभागाने संयुक्तरित्या ताळमेळ घालून अंतीम यादी तयार करणे. | संबंधित जिल्हाधिकारी, | **३१.१२.२०१६** |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या ताब्यात असलेल्या वन जमिनीपैकी अतिक्रमण विरहित क्षेत्र वन विभागाच्या ताब्यात देण्याबाबतचे आवश्यक आदेश पारित करणे. | संबंधित जिल्हाधिकारी, | **१५.०१.२०१७** |
| ३ | वन विभागाने जमिनीचा प्रत्यक्ष ताबा घेणे. | संबंधित जिल्हाधिकारी, उप वनसंरक्षक | **३१.०१.२०१७** |
| ४ | महसूली अभिलेख गाव नमुना नंबर (७/१२) अद्यावत करणे. | संबंधित जिल्हाधिकारी, | **२८.०२.२०१७** |

५. भारतीय वन अधिनियम, १९२७ च्या कलम ४ आणि कलम २० अंतर्गत राखीव वन अथवा कलम २९ अंतर्गत संरक्षित वन म्हणून अधिसूचित झाल्यानंतर तातडीने सदर क्षेत्राच्या गाव नमुना नंबर ७/१२ उताऱ्यावर त्याबाबतच्या नोंदी घेण्यात याव्यात. आजतागायत भारतीय वन अधिनियम, १९२७ च्या कलम ४/२०/२९ अंतर्गत अधिसूचित ज्या क्षेत्राबाबत गाव न. नं. ७/१२ सदरी "राखीव वन / संरक्षित वन" अशा नोंदी घेण्यात आलेल्या नाहीत, अशा क्षेत्राची यादी संबंधित उप वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी यांनी तयार करुन संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे **दिनांक ३१.१२.२०१६ पर्यंत** सादर करावी व त्यानुषंगाने संबंधित जिल्हाधिकारी यांनी अशा प्रकरणात आपल्या स्तरावरुन खात्री करुन **दिनांक ३१.०१.२०१७ पर्यंत** सदर क्षेत्राच्या गाव न. नं. ७/१२ उताऱ्यावर योग्य त्या नोंदी घेण्याची कार्यवाही संबंधित महसूल अधिकाऱ्यामार्फत पूर्ण करुन घ्यावी.

६. उपरोक्त कार्यवाही या परिपत्रकान्वये दिलेल्या कालमर्यादेत पूर्ण होईल, हे संबंधित विभागीय आयुक्त यांनी सुनिश्चित करुन घ्यावे. याबाबत प्रगतीचा आढावा मा.मुख्य सचिव यांचे द्वारे विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी यांच्याशी व्हिडीओ कॉन्फरन्स (VC) द्वारे होणाऱ्या बैठकीही अंतर्गत घेतला जाईल.

सदरचे परिपत्रक महसूल विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२०२१८४५४१८५१९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikas S Kharage

Digitally signed by Vikas S Kharage
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9573972c3f3a12761ae9fe8e3a40abf36ec83d868bdec816db83bef158f491cb, cn=Vikas S Kharage
Date: 2016.12.02 18:47:27 +05'30'

( विकास खारगे )
सचिव (वने)

<u>प्रत :-</u>

१) प्रधान सचिव, (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) विभागीय आयुक्त (सर्व).

६) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव) (सर्व).
७) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
८) जिल्हाधिकारी, (सर्व)
९) उप वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी (सर्व).